**महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेची प्रचार व प्रसिध्दी करण्यासाठी जाहिरात संस्थांचे पॅनेल तयार करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मग्रारोहयो २०१४/प्र.क्र.४९/रोहयो-६ब

नवीन प्रशासकीय भवन, १६ वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ३० जुलै, २०१५

वाचा :

1) **विभागाचा शासन निर्णय क्रमांकः मग्रारोहयो २००८/प्र.क्र.२४/रोहयो-१, दि.१३/०२/२००८**
2) **राज्य मंत्रिमंडळाचा दि. १२/५/२०१० रोजीचा निर्णय**
3) **विभागाचा शासन निर्णय क्रमांकः नरेगा २०१०/प्र.क्र.१४६/रोहयो-६, दि. ८ ऑक्टोबर,२०१०**
4) **दि. १ जून, २०१२ रोजी मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या महाराष्ट्र रोजगार हमी योजना परिषदेच्या दुसऱ्या बैठकीतील निर्णय.**
5) **विभागाचा शासन निर्णय क्रमांकः मग्रारोहयो २०१२/प्र. क्र. ६५/रोहयो-६ब, दि. ६ सप्टेंबर, २०१२**

**प्रस्तावना :**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना दि. १ एप्रिल, २००८ पासून राज्यात सर्व जिल्हयांत राबविण्यात येत आहे. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना ही मागणी प्रवण योजना आहे. यासाठी या योजनेची व्यापक प्रचार व प्रसिध्दी होण्याची आवश्यकता आहे. ही बाब लक्षात घेऊन महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेची प्रसिध्दी विविध माध्यमांतून करण्याचा निर्णय संदर्भ क्रमांक १ येथे नमूद दि. १३/०२/२००८ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला. तसेच, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत नियुक्त केलेल्या मंत्रिमंडळ उप समितीने योजनेची प्रचार, प्रसिध्दी व जाणीवजागृती करण्याची शिफारस केली होती. राज्य मंत्रिमंडळाने सदर शिफारस दि. १२ मे, २०१० रोजीच्या बैठकीत मान्य केली. संदर्भ क्र. ३ येथे नमूद दि. ८/१०/२०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये स्वयंसेवी संस्थांच्या मदतीने योजनेचा प्रचार, प्रसार व जाणीव जागृतीकरिता नावीन्यपूर्ण जागृती कार्यक्रम काही विशिष्ट कालावधीकरिता राबविण्याचा निर्णय विभागाने घेतला होता. तसेच, दिनांक १ जून, २०१२ रोजी मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र रोजगार हमी परिषदेची दुसरी बैठक पार पडली होती. सदर बैठकीत या योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीकरिता प्रचार व प्रसिध्दीवर भर दयावा, असा निर्णय घेण्यात आला आहे. योजनेच्या प्रचार व प्रसिध्दीच्या कामासाठी विभागामार्फत संदर्भ क्र. ५ येथे नमूद दि. ६ सप्टेंबर, २०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये जाहीरात संस्थांची निवडसूची (पॅनेल) दोन वर्षाच्या कालावधीकरिता तयार करण्यात आली होती. सदर पॅनेलचा कालावधी संपुष्टात आला आहे. केंद्र शासनाच्या निदेशानुसार IEC आराखडा राबविण्यात येत आहे. सदर आराखडा राबविण्यासाठी तज्ञ व अनुभवी जाहिरात संस्थांची आवश्यकता आहे. यास्तव, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेसंबंधीत कार्यक्रमांचा प्रचार व प्रसिध्दी करण्यासाठी व जाहीरातविषयक कार्ये पार पाडण्यासाठी जाहीरात संस्थांची निवडसूची तयार करण्याकरिता वृत्तपत्रांमध्ये जाहिरात देऊन जाहिरात संस्थांकडून अर्ज मागविण्यात आले होते. त्यानुसार एकूण ३२ जाहिरात संस्थांकडून विभागास अर्ज प्राप्त झाले. जाहीरात संस्थांची निवड करण्यासाठी विभागाच्या दि. १६ जानेवारी, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये सचिव (रोहयो) यांच्या अध्यक्षतेखाली ७ सदस्यीय समितीचे गठन करण्यात आले आहे. विभागाने जाहीरात संस्थांनी सादर केलेल्या अर्जांची प्राथमीक स्तरावर पडताळणी करुन विशिष्ट निकषांची पूर्तता करण्यास पात्र ठरलेल्या

१२ जाहिरात संस्थांचे सादरीकरण घेतले. तद्नंतर सचिव (रोहयो) यांच्या अध्यक्षतेखालील समितीने या १२ जाहिरात संस्थांचे गुणांकन केले आहे. त्यापैकी गुणानुक्रमे पहिल्या ८ जाहिरात संस्थांची निवडसूची (Empanelment) मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे :-

## शासन निर्णय:

प्रस्तावनेत नमूद केलेल्या प्रयोजनासाठी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट - १ मध्ये नमूद केलेल्या एकूण आठ जाहीरात संस्थांचा नियोजन (रोहयो) विभागाच्या अनुसूची (पॅनल) मध्ये समावेश करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

या जाहीरात संस्थांचा पॅनलमधील समावेश खालील अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे :

१. दूरदर्शन, प्रसारभारती, आकाशवाणी व इंडियन न्युजपेपर सोसायटी या शासकीय संस्थांनी दिलेली अधिस्विकृती किंवा त्यांना अन्यथा असलेल्या जाहीरात विषयक कामांचा पूर्वानुभव व कामांची गुणवत्ता विचारात घेऊन सदर जाहीरात संस्थांचा या राज्यस्तरीय अनुसूचीमध्ये (पॅनेलमध्ये) अंतर्भाव करण्यात आला आहे. या जाहीरात संस्थांच्या सेवांचा उपयोग महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना विषयक व इतर अनुषंगिक कार्यक्रमांच्या प्रचार व प्रसिध्दीच्या कामांसाठी आवश्यकतेनुसार करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेसंबंधी प्रचार, प्रसिध्दी रोहयो विभागाच्या आयुक्त, नरेगा आयुक्तालय, नागपूर, विभागीय आयुक्त यांच्या स्तरावर तसेच, क्षेत्रिय कार्यालयांद्वारे म्हणजे जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी स्तरावर करणे आवश्यक असल्यास सदर पॅनलमधील जाहिरात संस्थांच्या सेवांचा उपयोग, शासनाच्या पूर्वपरवानगीने करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. या अनुसूचींमध्ये अंतर्भाव करण्यात आलेल्या जाहीरात संस्थांच्या सेवांचा उपयोग करण्यासाठी पारदर्शक व स्पर्धात्मक पध्दतीचा अवलंब करुन प्रत्येक कामाचे दर अंतिम करण्याचे अधिकार शासनाच्या रोहयो विभागाचे राहतील. प्रचार प्रसिध्दीच्या कामांचे प्रामुख्याने खालील गट करण्यात येत असून प्रत्येक गटातील कामांसाठी त्यापुढे नमूद केलेल्या पध्दतीचा वापर करून जाहीरत संस्थेची निवड संबंधीत कामासाठी करण्यात येईल.

**अ) छपाई व कार्यक्रम व्यवस्थापनाचे काम :** सर्व प्रकारची छपाई (उदा. ब्रोशर्स, भिंतीफलक, माहितीपुस्तिका इ.) व कार्यक्रम व्यवस्थापनाचे उदा. मेळावे, कार्यशाळा, चर्चासत्र, मार्गदर्शन शिबिर ई.सारख्या व तत्सम कार्यक्रमांच्या आयोजनांसाठी सर्वांत कमी किंमतीची निविदा सादर करणाऱ्या जाहिरात संस्थेलाच सदर काम देण्यात यावे.

**ब) वर्तमानपत्रांमधील जाहिरातीचे आर्टवर्क तयार करणे व जाहिरातीचे प्रसारण करणे:-**

उत्कृष्ट संकल्पना (Theme ) सादर करणाऱ्या जाहिरात संस्थेस जाहिरातीचे आर्टवर्क तयार करण्याचे काम देण्यात येईल. विभागाच्या सर्व जाहिरातीचे प्रसारण शक्यतो माहिती व जन संपर्क महासंचालनालयाच्या मुंबई येथील मुख्यालयातील जाहिरात शाखेमार्फत करण्यात येईल. एखादी जाहिरात अगदीच तातडीने प्रसिध्द करावयाची गरज निर्माण झाल्यास अपवादात्मक परिस्थितीत ती वृत्तपत्रांकडे परस्पर पाठविण्यात येईल. अशा प्रसंगी माहिती व जन संपर्क महासंचालनालयाच्या मुख्यालयातील जाहिरात शाखेकडे संपर्क साधून सदर जाहिरात प्रसिध्द करण्यासाठी शासनमान्य यादीतील योग्य अशा वृत्तपत्रांची नावे जाणून घेण्यात येतील.

**क) दृकश्राव्य (Audio -Visual) माध्यमातून जाहिरातींचे प्रसारण** :-योजनेसंबंधीचे माहितीपट, शैक्षणिक लघुपट, यशोगाथापट, जाहिराती, रेडिओ जिंगल्स इ. तयार करणे तसेच, DAVP दराने त्या प्रसारित करण्यासाठी खालील प्रक्रियेचा अवलंब करण्यात यावा:-

क (१) प्रथम संबंधित विशिष्ट कामांच्या तांत्रिक व आर्थिक निविदा स्वतंत्र लिफाफ्यात पॅनलवरील सर्व जाहिरात संस्थांकडून मागवाव्यात व त्यासाठी किमान ७ दिवसांची वेळ द्यावी. कामाची तातडी विचारात घेऊन हा कालावधी कमी करण्याचा अधिकार संबंधीत यंत्रणेच्या प्रमुखास राहील. प्राप्त झालेल्या तांत्रिक निविदा प्रथम उघडून घ्याव्यात व परिशिष्ट-२ मध्ये नमूद केलेल्या तांत्रिक बाबींचा (उदा. क्षमता बांधणी, आर्टवर्क, कल्पकता, नाविन्यपूर्णता इ.) विचार करुन अनुक्रमे पहिल्या तीन तांत्रिकदृष्टया सक्षम ठरणाऱ्या निविदाकारांचे आर्थिक निविदांचा विचार करण्यात यावा. इतर आर्थिक निविदा न उघडताच संबंधीतांना परत कराव्यात. तांत्रिक निविदा उघडल्यावर परंतु आर्थिक निविदा उघडण्यापूर्वी आवश्यकतेनुसार तांत्रिक निविदा सादर केलेल्या निविदाधारकांकडून संबंधीत विषयावर दृकश्राव्य पध्दतीचे अथवा प्रत्यक्ष मुलाखतीद्वारे कामाची गुणवत्ता मापन व परिणामकारकता यासाठी सादरीकरण घ्यावे व निविदांच्या तांत्रिक क्षमतेची त्या कामाच्या अनुषंगाने अंतिम निश्चिती करावी. अशाप्रकारे कामाच्या स्वरुपानुसार मुल्यांकन करुन सर्व निविदाकारांचा तांत्रिक गुणानुक्रम निश्चित करावा. अशा ३ प्रथम क्रमांकाच्या तांत्रिक निविदा असणाऱ्या निविदाकारांच्या आर्थिक निविदा उघडून खालीलप्रमाणे पध्दतीचा अवलंब करुन प्रथम क्रमांकावर येणारी निविदा अंतिम करावी.

क (२) गुणानुक्रमे तांत्रिक क्षमतेत तीनपैकी कामाच्या स्वरुपानुसार प्रभावीपणे काम करु शकणाऱ्या निविदाकारांपैकी ज्या निविदाकाराचे तांत्रिक सादरीकरण, क्षमता बांधणी, आर्टवर्क, कल्पकता, नाविन्यपूर्णता इत्यादी बाबी विचारात घेऊन निविदा सर्वोत्कृष्ट ठरली व प्रथम क्रमांकावर आली त्या निविदाकारास ६० गुण द्यावे. गुण कसे द्यावे, याचे सर्वसाधारण मार्गदर्शन परिशिष्ट - २ मध्ये नमूद करण्यात आले आहे.

उर्वरित क्रमांक दोन व तीन वरील निविदाकारांना त्या प्रमाणात तांत्रिक निविदेसाठी ६० कमाल गुण विचारात घेऊन त्यांच्या तपासलेल्या तांत्रिक क्षमतेनुसार त्याप्रमाणात कमी गुण द्यावे व त्याचे विश्लेषण दफ्तरी करुन ठेवावे. हे तांत्रिक विश्लेषण करतांना कामाची गरज पाहून गुण द्यावे. यासाठी त्या क्षेत्रातील तज्ज्ञांची आवश्यकतेनुसार मदत घ्यावी.

क (३) त्यानंतर या तीन संस्थांच्याही आर्थिक निविदा उघडाव्यात. त्यापैकी किमान दराच्या आर्थिक निविदेला ४० गुण द्यावेत. इतर दोघांना खालील सूत्रानुसार निश्चित करुन येणारे गुण द्यावे:-

१) किमान आर्थिक निविदाकाराची रक्कम
--------------------------------- X ४० = दुसऱ्या क्रमांकाच्या निविदाकाराचे गुण
दुसऱ्या क्रमांकाच्या निविदाकाराची रक्कम

२) याप्रमाणे तिसऱ्या निविदाकाराचेही गुण निश्चित करावे.

क (४) त्यानंतर क (२) व क (३) मध्ये प्रत्येकाला मिळालेल्या गुणांची बेरीज करुन अशा पध्दतीने ज्या निविदाकाराला सर्वात जास्त गुण मिळाले असतील. त्या निविदाकाराशी अंतिम वाटाघाटी करुन कामाचे वाटप करावे व त्याच्याशी आवश्यकतेनुसार करारनामा करावा व त्यांना कार्यादेश द्यावा. अशाप्रकारे निश्चितीचे सविस्तर उदाहरण परिशिष्ट -३ मध्ये दिले आहे.

३. अपवादात्मक तातडीच्या प्रकरणांमध्ये जाहीरातीसंबंधी कोणतेही काम देतांना कामाचे स्वरुप व शिल्लक असलेला अल्प वेळ विचारात घेऊन पॅनलवरील कोणत्याही संस्थेस ते काम नेमून देण्याचे अधिकार सचिव (रोहयो) यांना आहेत. अशा प्रकरणांमध्ये उपरोक्तप्रमाणे नमूद केलेल्या निविदा प्रक्रियेची आवश्यकता राहणार नाही. यासाठी पूर्वानुभव विचारात घेऊन पॅनलवरील कोणत्याही संस्थेस काम प्रदान करण्याचे अधिकार त्यांना राहतील. त्याचप्रमाणे कामाचे स्वरुप व व्याप्ती विचारात घेऊन एखादे काम पॅनलवरील इतर संस्थांना विभागून देण्याचे अधिकार सुध्दा सचिव (रोहयो) यांना राहतील.

४. अनूसूचीमध्ये समाविष्ट असलेल्या संस्थांचा जाहीरात क्षेत्रातील कामांचा अनुभव व व्याप्ती लक्षात घेता सर्वसाधारणपणे पुढील प्रकारची कामे या संस्थांकडे सोपविता येतील:

अ) प्रभावी प्रचार व प्रसिध्दीसाठी संकल्पना निर्मिती करणे (Conceptualization)

ब) दृक-श्राव्य, प्रिंट व इलेक्ट्रॉनिक मिडियाच्या माध्यमातून योजनेची प्रसिध्दी करणे,

क) विविध माहिती पुस्तिका, पत्रके, भित्तीपत्रिका, फलक, बॅजेस, भित्तीचित्रे यांचे आरेखन व छपाई

ड) ग्रामीण भागात विविध मेळावे आयोजित करणे/विविध प्रदर्शनात स्टॉल्स उभारणे.

इ) संपूर्ण महाराष्ट्रात प्रदर्शनाचे आयोजन तसेच, कार्यक्रम व्यवस्थापन (Event Management)

फ) संपूर्ण देशातील नरेगा योजने संदर्भातील वृत्तपत्र कात्रणे आणि माहिती पुरविणे.

५. जाहीरात संस्थेस जाहीरातविषयक काम देतांना आवश्यकता असल्यास कामाच्या अटी व शर्तीचा समावेश असलेला उभयपक्षी करारनामा करुन त्यानंतरच कार्यादेश निर्गमित करण्यात यावेत अथवा कार्यारंभ आदेशामध्ये अटी व शर्ती नमूद करुनच कार्यारंभ आदेश निगर्मित करावे.

६. कोणत्याही प्रकारचे वर नमूद केलेले प्रचार प्रसिध्दीविषयक काम करण्यापूर्वी त्या कामाच्या खर्चासाठी अग्रीम रक्कम अनुज्ञेय नाही.

७. नेमून दिलेले काम विहित वेळेत व करारनामा /कार्यारंभ आदेशातील अटी व शर्तीनुसार पूर्ण झाल्याची संबंधित यंत्रणेच्या विभागप्रमुखांची खात्री झाल्यानंतरच जाहीरातीच्या देयकाचे प्रदान करण्यात येईल.

८. या जाहीरात संस्थांचा पॅनेलवरील समावेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या कालावधीकरिता राहील. या दोन वर्षाच्या कालावधीतील या संस्थांच्या एकूण कार्यक्षमतेचा व परिणामकारकतेचा आढावा घेऊन संबंधीत संस्थेच्या पॅनेलमधील समावेशास पुढील मुदतवाढ देण्याचे अथवा पॅनेलवरुन नाव कमी करण्याचे अधिकार शासनास असतील.

९. उपरोक्त पॅनेलवरील जाहीरात संस्थांच्या कामकाजाबाबत महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेची अंमलबजावणी करणा-या यंत्रणा व इतर शासकीय/निम शासकीय संस्था यांच्याकडून तक्रार प्राप्त झाल्यास त्या तक्रारीची योग्य तपासणी करुन सदर जाहीरात संस्थेचे नाव अनुसूचीमधून (पॅनलमधून) कमी करण्याचे अधिकार शासनास राहतील.

१०. उपरोक्त परिच्छेदांमध्ये नमूद केलेल्या अटींशिवाय जादा अटी समाविष्ट करण्याचे अधिकार शासनास असतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२९१०२८४३९३१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vimala R

Digitally signed by Vimala R
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vimala R
Date: 2015.08.05 16:40:13 +05'30'

**(आर.विमला)**
उपसचिव (रोहयो)

**प्रत,**

१. मा.मंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव

२. सचिव (रोहयो) यांचे स्वीय सहायक,

३. आयुक्त (नरेगा), नरेगा आयुक्तालय, नागपूर,

४. सर्व विभागीय आयुक्त,

५. सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा कार्यक्रम समन्वयक,(मुंबई शहर व उपनगर वगळून)

६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी तथा सह जिल्हा कार्यक्रम समन्वयक, जि.प.

७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,

८. मे. मार्केटिंग कन्सलटंस ॲण्ड एजन्सीज लि., मुंबई

९. मे. पॅरामीन ॲडव्हर्टायझिंग ॲण्ड मार्केटींग असोसिएट्स, मुंबई]

१०.मे . पाम ॲडव्हर्टायझिंग ॲण्ड मार्केटिंग, नवी दिल्ली

११.मे. गायो एंटरप्राइझेज, पुणे.

१२.मे. कॉन्सेफ्ट कम्युनिकेशन प्रा. लि., मुंबई.

१३.मे. रेडिफ्युजन डेन्टसु यंग ॲण्ड रुबीकम प्रा. लि., मुंबई

१४.मे. गोल्डमाईन ॲडव्हर्टायझिंग लि., मुंबई.

१५.मे. स्पॅन कम्युनिकेशन्स, दिल्ली.

१६. सर्व उप सचिव, अवर सचिव, कार्यासन अधिकारी, सहायक संचालक, संशोधन अधिकारी (रोहयो प्रभाग)

१७.निवडनस्ती.

## परिशिष्ट-१

# पॅनेलवरील जाहिरात संस्थांची यादी

| अ.क्र. | जाहिरात संस्थेचे नाव | जाहिरात संस्थेचा पत्ता |
|---|---|---|
| १ | मे. मार्केटिंग कन्सलटंस ॲण्ड एजन्सीज लि. | १०, बेसमेण्ट, अरुण चेंबर, ताडदेव मेन रोड, मुंबई-४०० ०४३<br>दुरध्वनी क्र. ०२२-२३५४५३६४<br>ईमेल- mcamumbailtd@gmail.com, mcamumbai@mcaltd.in |
| २ | मे. पॅरामीन ॲडव्हर्टायझिंग ॲण्ड मार्केटींग असोसिएट्स | ४-ए, बोटावाला चेंबर्स, पहिला मजला, पी.एम. रोड, फोर्ट, मुंबई-०१<br>दुरध्वनी क्र. ०२२-२२७०३३३३/३४<br>ईमेल- csparam@gmail.com/ paraminad@gmail.com |
| ३ | मे. पाम ॲडव्हर्टायझिंग ॲण्ड मार्केटिंग | ३०२-३०४, सेठी भवन ७, राजेंद्र पॅलेस, नवी दिल्ली -११० ००८.<br>सी-३२१, कैलास एक्सप्लेनेड, एल बी एस रोड, घाटकोपर (प), मुंबई- ४०० ०८६<br>दुरध्वनी क्र. ०२२-२५००३५५६/५७<br>ईमेल-pammdelhi@gmail.com<br>pammmumbai@rediffmail.com |
| ४ | मे. गायो एंटरप्राइझेज | सेक्टर नं .२८, प्लॉट नं .२३४, पी. सी.एन.टी.डी.ए., पुणे-४४.<br>दुरध्वनी क्र. ०२० २४५३१३५५/ ६५२११९३७<br>ईमेल- gautams.gm@gmail.com<br>yande.gm@gmail.com |
| ५ | मे. कॉन्सेफ्ट कम्युनिकेशन प्रा. लि., मुंबई | क्वीन्स मॅन्शान, तळमजला, कॅथेड्रल स्कूलच्यापुढे, प्रेसकोट रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१.<br>दूरध्वनी क्र. ०२२-४०५५८८८८<br>ईमेल- srikanth@conceptindia.com |
| ६ | मे. रेडिफ्युजन डेन्टसु यंग ॲण्ड रुबीकम प्रा. लि. | टर्मिनल ९, दुसरा व तिसरा मजला, नेहरु रोड, विलेपार्ले (पूर्व), मुंबई -४०० ०९९.<br>दुरध्वनी क्र. ०२२-२६६३१२२०<br>ईमेल-sivadas.nair@rediffusionyr.com<br>suryawanshi.priyaratna@rediffusionyr.com |

| | | |
|---|---|---|
| ७ | मे. गोल्डमाईन ॲडव्हर्टायझिंग लि. | ३०६, द सुमित, वेस्टर्न एक्सप्रेस हायवे, हनुमान रोड जवळ, विलेपार्ले (पूर्व), मुंबई-४०० ०५७.<br>दुरध्वनी क्र. ०२२-२६२६२०२०<br>ईमेल- arvind@goldmineltd.com |
| ८ | मे. स्पॅन कम्युनिकेशन्स | बी -१७४, ईस्ट ऑफ कैलास, नवी दिल्ली -११००६५<br>दुरध्वनी क्र. ०२२-४००४४२७१<br>ईमेल- delhi@spancom.in/<br>mumbai@spancom.in |

## परिशिष्ट -२

## तांत्रिक मुल्यांकनासाठी मार्गदर्शक तत्वे

| अ.क्र. | मुद्दा | कमाल गुण | प्राप्त गुण |
|---|---|---|---|
| १ | कामाचे स्वरुप पाहता प्रचार प्रसिध्दीच्या माध्यमातून जनमानसापर्यंत जे संदेश द्यावयाचे आहेत, माहिती पोहोचवायची आहे. क्षमता बांधणी (Capacity Building)अपेक्षित आहे, ते पूर्णपणे संकल्पनेत, आर्टवर्कमध्ये प्रभावीरित्या मांडले गेले काय, याची तपासणी करुन द्यावयाचे गुण | २० | |
| २ | संकल्पनेची, मांडणीची, आर्टवर्कमधील<br>अ) कल्पकता - १० गुण<br>ब) नाविन्यपूर्णता - १० गुण | <br>१५<br>१५ | |
| ३ | तांत्रिक मनुष्यबळ व उपलब्ध पायाभूत सुविधा | १० | |
| | **एकूण गुण** | **६०** | |

## परिशिष्ट -३
## तांत्रिक व आर्थिक निविदांना गुणवितरण करण्यासाठी उदाहरण

१) समजा अ,ब,क,ड,ई,फ या सहा निविदाकारांच्या तांत्रिक व आर्थिक निविदा प्राप्त झाल्या.

२) यापैकी समजा तांत्रिक मुल्यांकनात गुणानुक्रम खालीलप्रमाणे ठरले.

| | | |
|---|---|---|
| ब | - | १ |
| ड | - | २ |
| अ | - | ३ |
| इ | - | ४ |
| फ | - | ५ |
| क | - | ६ |

३) प्रथम क्र. १,२,३ गुणानुक्रमे निवडून त्यांचेकडून सविस्तर सादरीकरण घ्यावे व ३ गुणानुक्रमे निश्चित करुन क्र.१ ला ६० गुण धरुन इतरांना त्या प्रमाणात कमी गुण द्यावेत. समजा ते खालीलप्रमाणे मिळालेत.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (i) | ब | १ | - | ६० गुण |
| (ii) | ड | २ | - | ५० गुण |
| (iii) | अ | ३ | - | ४५ गुण |

४) त्यानंतर वरील तीन निविदाकारांचे आर्थिक प्रस्ताव उघडावे, समजा ते खालीलप्रमाणे आहेत:

| | | | |
|---|---|---|---|
| ब | - | रु. | ५ लाख |
| ड | - | रु. | ४ लाख |
| अ | - | रु. | ४.५ लाख |

या संस्थांपैकी सर्वात कमी आर्थिक निविदा असलेल्या **ड** निविदाकारास **४० गुण** द्यावेत. इतर दोघांना खालीलप्रमाणे गुण द्यावेत:-

ब - $\dfrac{\textbf{ड} \text{ ची निविदा रक्कम}}{\textbf{ब} \text{ ची निविदा रक्कम}} \times ४० = \dfrac{४}{५} \times ४० =$ **३२ गुण**

अ - $\dfrac{\textbf{ड} \text{ ची निविदा रक्कम}}{\textbf{अ} \text{ ची निविदा रक्कम}} \times ४० = \dfrac{४}{४.५} \times ४० =$ **३५.६ गुण**

५) अंतिम मुल्यांकन खालीलप्रमाणे ठरेल :-

| **निविदाकार** | **तांत्रिक गुण** | **आर्थिक गुण** | **एकूण** | **अंतिम गुणानुक्रम** |
|---|---|---|---|---|
| अ | ४५ | ३५.६ | ८०.६ | ३ |
| ब | ६० | ३२.० | ९२.० | १ |
| ड | ५० | ४०.० | ९०.० | २ |

**ब** ची रु. ५ लाखाची निविदा मान्य होईल. त्या निविदाकाराशी वाटाघाटी करुन निविदा अंतिम करता येईल किंवा नाकारता येईल. मात्र नाकारल्यास पुन्हा नव्यानेच वरीलप्रमाणे संपूर्ण प्रक्रिया पॅनेल वरील सर्व जाहिरात संस्थांकडून पुन्हा तात्रिक व आर्थिक निविदा मागविण्यापासून करण्यात येईल.